गट-क मधील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी अर्हता प्राप्त करणाऱ्या मंत्रालयीन विभागातील गट-ड मधील कर्मचाऱ्यांची दि.२१.०२.२०१८ रोजीची तात्पुरती (Provisional) (सेवाप्रवेश नियमात सुधारणा झाल्यानुसार एसएससी उत्तीर्णसह कर्मचाऱ्यांचा समावेश करुन) ज्येष्ठतेनुसार यादी.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः साजेसू-३७१८/प्र.क्र.१७४/१४-अ,**
**मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**तारीख: ३१ जुलै, २०२०**

वाचा: १) शासन परिपत्रक क्रमांक:साजेसू-३७१८/प्र.क्र.१७४/१४-अ, दिनांक १५ जानेवारी, २०१९
२) शासन परिपत्रक क्रमांक:साजेसू-३७१८/प्र.क्र.१७४/१४-अ, दिनांक १८ फेब्रुवारी, २०१९

**शासन परिपत्रक**

शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३ /१४-अ, दिनांक २१ फेब्रुवारी, २०१८ अधिसूचित करण्यात आलेली असून त्यानुसार दिनांक २१ फेब्रुवारी, २०१८ पासून मंत्रालयीन विभागातील गट-ड संवर्गातून मंत्रालयीन संवर्गातील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीने नियुक्ती करीता शैक्षणिक अर्हता पदवी करण्यात आलेली आहे. तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३/१४-अ, दिनांक २३-०१-२०२० अन्वये बृहन्मुंबई शासकीय कार्यालयातील “लिपिक-टंकलेखक”, गट-क (सेवाप्रवेश) (सुधारणा) नियम, २०२० अधिसूचित करण्यात आलेले असून त्यामधील परंतुकानुसार गट-ड मधून गट-क मधील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीकरीता शैक्षणिक अर्हता ही दिनांक २०-०२-२०२३ पर्यंत “माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण” केलेल्या कर्मचाऱ्यांचाही पदोन्नतीकरीता विचार करण्यात यावा अशा प्रकारे सुधारित करण्यात आलेली आहे. उपरोक्त प्रमाणे सेवाप्रवेश नियमात सुधारणा करण्यात आल्याच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्रमांक १ व २ वरील ज्येष्ठतेनुसार यादी पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.

२. मंत्रालयीन विभागातील गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांपैकी, गट-क मधील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी अर्हता प्राप्त व पदोन्नतीसाठी अर्ज केलेल्या कर्मचाऱ्यांची दि.२१.०२.२०१८ रोजीची तात्पुरती (Provisional) **(सेवाप्रवेश नियमात सुधारणा झाल्यानुसार एसएससी उत्तीर्णसह कर्मचाऱ्यांचा समावेश करुन)** ज्येष्ठतेनुसार यादी तयार करण्यात आली आहे.

३. सदर जेष्ठतेनुसार यादीमध्ये लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी अर्हता प्राप्त व पदोन्नतीसाठी अर्ज केलेल्या, दि.२१ फेब्रुवारी, २०१८ रोजी गट-ड या संवर्गात किमान ३ वर्षाची नियमित सेवा पुर्ण केलेल्या, पदवी अथवा तत्सम परिक्षा उत्तीर्ण किंवा माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व टंकलेखनाचे आवश्यक गती (प्रती मिनीट ४० शब्द इंग्रजी किंवा ३० शब्द मराठी) असल्याचे नियमानुसार विहित केलेले प्रमाणपत्र (शासकीय वाणीज्य प्रमाणपत्र (गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट)) किंवा संगणक टंकलेखन प्रमाणपत्र धारण केलेल्या गट-ड मधील कर्मचाऱ्यांचा समावेश करण्यात आलेला आहे. सदर ज्येष्ठतेनुसार यादी या परिपत्रकासोबत परिशिष्ट 'अ' येथे जोडण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.बिंदुना-१०१८/प्र.क्र.५४/१४-अ,

दि.०५.१२.२०१८, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/१२, दि.२१.१०.२०११ तसेच सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १२ यांनी नस्ती क्र.बिंदुना-१०१८/प्र.क्र.५४/१४-अ वर अनौपचारिक संदर्भ क्र.१२८२/१८, दिनांक ३१-१०-२०१८ अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार सदर ज्येष्ठतेनुसार यादी तयार करण्यात आलेली आहे.

४. सदर ज्येष्ठतेनुसार यादी तयार करताना मुख्यत्वेकरुन महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ मधील तरतूदींचा अवलंब करण्यात आला आहे.

५. सर्व मंत्रालयीन विभागाना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत तात्पुरती (Provisional) ) **(सेवाप्रवेश नियमात सुधारणा झाल्यानुसार एसएससी उत्तीर्णसह कर्मचाऱ्यांचा समावेश करुन)** ज्येष्ठतेनुसार यादी (दि.२१.०२.२०१८ ची जेष्ठतेनुसार यादी - परिशिष्ट"अ") त्यांनी आपल्या विभागातील गट-ड संवर्गातील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी अर्हता प्राप्त व पदोन्नतीसाठी अर्ज केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावी. तसेच सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.बिंदुना-१०१८/प्र.क्र.५४/१४-अ, दि.०५.१२.२०१८ मधील सूचनांनुसार एखादया कर्मचाऱ्याचे नाव जेष्ठतेनुसार यादीत समाविष्ट करावयाचे राहीले असल्यास त्याबाबत संबंधित कर्मचाऱ्यांनी विभागामार्फत निवेदन सादर करावे अशा सूचना त्यांना देण्यात याव्यात. कर्मचाऱ्यांच्या निवेदनातील वस्तुस्थिती/आक्षेपांची तसेच ज्येष्ठतेनुसार यादीतील स्तंभ ३ ते १५ मधील माहितीची काळजीपूर्वक तपासणी करुन ज्येष्ठतेनुसार यादीतील त्रुटी अथवा वास्तविक चुका (एखाद्या कर्मचाऱ्यांचे नाव जेष्ठतेनुसार यादीत समाविष्ट करणे राहीले असल्यास) संबंधित विभागांनी त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापट व अन्य उपलब्ध अभिलेखावरुन तपासून विभागाच्या अभिप्रायांसह दिनांक १० ऑगस्ट, २०२० पूर्वी या विभागाच्या निदर्शनास आणाव्यात म्हणजे त्याची पडताळणी करुन ज्येष्ठतेनुसार यादीत आवश्यक ते बदल करणे शक्य होईल. अन्यथा संबंधितांस कोणतेही बदल सुचवावयाचे नाहीत असे समजून पुढील कार्यवाही करण्यात येईल. दिनांक १० ऑगस्ट, २०२० नंतर आलेल्या आक्षेपांचा विचार करण्यात येणार नाही.

६. सर्व मंत्रालयीन विभागांनी ज्येष्ठतेनुसार यादीची प्रत वेबसाईटवरुन प्राप्त करुन घ्यावी तसेच आपल्या विभागातील गट-ड संवर्गातील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी अर्हता प्राप्त व पदोन्नतीसाठी अर्ज केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांना ज्येष्ठतेनुसार यादीची प्रत वेबसाईटवरुन उपलब्ध करुन घेण्याबाबत कळवावे.

७. सदर परिपत्रक व ज्येष्ठतेनुसार यादी महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७३११५४७५६०००७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.07.31 16:34:04 +05'30'

**( ग. भि. गुरव )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट 'अ'**

**प्रति,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना).
२. निवड नस्ती / कार्यासन १४-अ, संग्रहार्थ

**शासन परिपत्रक क्रमांक साजेसू-3718/प्र.क्र.174/14-अ, दिनाक 31 जुलै, 2020 चे सहपत्र (परिशिष्ट "अ")**

लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी अर्हता धारण करीत असलेल्या व पदोन्नतीसाठी अर्ज केलेल्या मंत्रालयीन विभागातील गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांची दिनांक २१.०२.२०१८ रोजीची तात्पुरती (Provisional) जेष्ठतेनुसार यादी **(सेवाप्रवेश नियमात सुधारणा झाल्यानुसार एससएससी उत्तीर्णसह कर्मचाऱ्यांचा समावेश करुन)** (दिनांक २३-०१-२०२० रोजी सेवा प्रवेश नियमात सुधारणा झाल्यानुसार)

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | श्री / श्रीमती | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | विभागाचे नाव | कर्मचाऱ्याचा जात प्रवर्ग | गट-ड मधील नियुक्ती प्रवर्ग | जन्म दिनांक | चतुर्थश्रेणी मधील नियुक्तीचा दिनांक | एसएससी परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | मराठी/इंग्रजी टंकलेखनाची शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | एमएससीआयटी संगणक परीक्षा उत्तीर्ण केल्याचा दिनांक | लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी जेष्ठता दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| १ | १ | श्री | अ.भा.चोगले | शिपाई | साआवि | विमाप्र | विमाप्र | ०१-०६-१९६६ | १०-०४-१९९० | ०८-०६-२०१५ | नाही | २६-१०-२०१७ | नाही | ०८-०६-२०१५ | |
| २ | २ | श्रीमती | ज.पां.बावधाणे | नाईक | अनापुवग्रासंवि | भज-क | भज-क | १९-०३-१९७१ | ०८-०६-२००१ | ०८-०६-२०१५ | नाही | २६-१०-२०१७ | नाही | ०८-०६-२०१५ | |
| ३ | ३ | श्री | अ.कृ.जोगी | शिपाई | जलसंपदा | भज-ब | भज-ब | ३१-१२-१९८३ | ०२-०७-२०१२ | १२-०१-२०१६ | २८-०६-२०१७ | २६-१०-२०१७ | नाही | १२-०१-२०१६ | |
| ४ | ४ | श्री | कै.कि.कांबळे | शिपाई | ग्राविवि | अजा | अजा | ०३-०२-१९८४ | २०-११-२०१२ | १२-०१-२०१६ | २२-०६-२०१९ | २६-१०-२०१७ | ०५-११-२०१५ | १२-०१-२०१६ | |
| ५ | ५ | श्री | सु.रा.खेडकर | शिपाई | अनापुवग्रासंवि | भज(ड) | भज(ड) | २२-११-१९८६ | २७-०१-२०१४ | १६-१२-२००२ | ३१-११-२०११ | ०८-१०-२०१२ | ३०-०५-२००७ | २६-०१-२०१७ | |
| ६ | ६ | श्री | सं.शे.भालेराव | शिपाई | अनापुवग्रासंवि | अजा | अजा | २८-१०-१९८० | ३०-०१-२०१४ | मार्च १९९८ | बारावी | २७-०८-२०१४ | नाही | २९-०१-२०१७ | |
| ७ | ७ | श्री | ज्ञा.स.डगळे | शिपाई | अनापुवग्रासंवि | अज | अज | ०१-१०-१९८१ | ३०-०१-२०१४ | ०१-१२-१९९८ | बारावी | १०-०८-२०१३ | १०-०३-२००५ | २९-०१-२०१७ | |
| ८ | ८ | श्री | पा.उ.चव्हाण | शिपाई | अनापुवग्रासंवि | विजा-अ | विजा-अ | ०१-०१-१९८५ | ०३-०२-२०१४ | २२-०६-२००४ | ०९-०७-२०१२ | २२-०२-२०१६ | ०४-०६-२०१५ | ०२-०२-२०१७ | |
| ९ | ९ | श्री | प्र.प.बगाडे | शिपाई | गृह | अजा़ | अजा़ | १९-१०-१९८२ | १०-०२-२०१४ | | ११-०१-२०११ | २६-१०-२०१७ | २७-१२-२०१७ | ०९-०२-२०१७ | |
| १० | १० | श्रीमती | सो.सु.चंदनशिवे | शिपाई | आविवि | खुला | खुला | ०२-१०-१९८५ | २१-०८-२००८ | १६-०५-२०१७ | नाही | ३१-०१-२०१२ | नाही | १६-०५-२०१७ | |